**राज्यातील आंतरराष्ट्रीय पदक प्राप्त खेळाडू व त्यांचे क्रीडा मार्गदर्शक यांना रोख बक्षिस देवून गौरविण्याबाबत करिता निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१६ /प्र.क्र १२९ /क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २९ मार्च, २०१७

वाचा-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ,शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र. क्र. १५८/१२/क्रीयुसे-२, दि.०४.०७.२०१३.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अ र्थसं - २०१६ / प्र.क्र ८९ / अर्थसं-३ ,दि.२०.०४.२०१६ .
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. आं.प.खे.रोखबक्षिसे / निधी वितरण/२०१६-१७ / का-६/०३३ दि. २७.०३.२०१७

प्रस्तावना -

राज्यातील आंतरराष्ट्रीय स्तरावर पदक प्राप्त करणाऱ्या खेळाडूंना व त्यांचे क्रीडा मार्गदर्शक / प्रशिक्षक यांना उपरोक्त संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये रोख बक्षिस देवून गौरविण्यात येते.

सन २०१६-१७ या वर्षात आंतरराष्ट्रीय स्तरावर पदक प्राप्त केलेल्या बिलीयर्डस(६), खो-खो(९), योगा(२), कॅरम(४), बुध्दीबळ(२) या खेळांतील एकूण २३ खेळाडूंना रोख बक्षिस देऊन गौरविण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देण्याकरिता सन २०१६-१७ या वर्षामध्ये आठमाही सुधारित अंदाजानुसार रु.८००.०० लाख निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी बिलीयर्डस (६), खो-खो (९), योगा (२), कॅरम (४), बुध्दीबळ (२) या खेळांतील एकूण २३ खेळाडूंना रु. ४५२.७५ लक्ष तरतूद वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक :ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९)(०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४ ५३२१)-५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर योजनेअंतर्गत खेळाडू / मार्गदर्शक यांना रोख पारितोषिक देण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट अ मधील नियम क्र.४ मधील पात्रतेचे निकष लागू राहतील.

४. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

४.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१८१९४३७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.29 18:23:30 +05'30'

**( कि.ल.संखे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

५) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
६) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
७) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
८) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
९) निवडनस्ती, क्रीयुसे-२.